महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. दुरुस्ती-०११९/प्र.क्र.१७४/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २० सप्टेंबर २०१९.

विषय :- रा.रा. पोलीस बल, गट क्र.१, पुणे, यांच्या आस्थापनेवरील प्रस्तावित *"Firing Range,"* वडाची वाडी, येथील २.५० कि.मी अंतर्गत कच्च्या रस्त्याचे काम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत.

संदर्भ :-

1. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3. पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ १९-ए/ अपोमसं-रारापोबल/ दुरुस्तीचे-प्रस्ताव/९९/ २०१९, दिनांक ०५.०७.२०१९.

ज्ञापन.

पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाने रा.रा. पोलीस बल, गट क्र.१, पुणे, यांच्या आस्थापनेवरील प्रस्तावित *"Firing Range,"* वडाची वाडी, येथील २.५० कि.मी अंतर्गत कच्च्या रस्त्याचे काम करण्यासाठी रु.२,५६,११,७३२/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे सहायक अभियंता, श्रेणी-१, सा.बां. उपविभाग क्र.१, पुणे, यांनी सन २०१८-१९ च्या दरसूचीनुसार तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, पुणे, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते रु.२३५.५० लक्ष असे सुधारित केले आहेत आणि, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, रा.रा. पोलीस बल, गट क्र.१, पुणे, यांच्या आस्थापनेवरील प्रस्तावित *"Firing Range,"* वडाची वाडी, येथील २.५० कि.मी अंतर्गत कच्च्या रस्त्याचे काम करण्यासाठी रु.२३५.५० लक्ष *(रुपये दोन कोटी, पस्तीस लक्ष, पन्नास हजार फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

1. अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, म.रा., यांनी खर्चाचे अंदाज साक्षांकित करणे आवश्यक आहे.
2. निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरु करु नये.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (२०५५ ०१६८) (अनिवार्य)(दत्तमत), २७-लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८८/१९/इमा.-२, दिनांक २८.०८.२०१९, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९११०५११५४२०६६२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL
GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.11.05 11:56:22 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, रा.रा. पोलीस बल, म.रा., मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, रा.रा. पोलीस बल, पुणे परिक्षेत्र, पुणे.
४) समादेशक, रा.रा. पोलीस बल, गट क्र.१, पुणे.

प्रत-

१) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, पुणे *(सा.बां. विभाग, यांनी मान्य केलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).